अर्थसंकल्पीय अनुदान २०१६-१७ विशेष घटक योजना (मागणी क्र. वाय-२ लेखाशीर्ष २२१५१८०७) उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर विद्युतपंप बसविणे, हातपंप /विद्युतपंप देखभाल दुरुस्ती व कमी क्षमतेच्या विंधण विहिरीचे जलभंजन करणे या कार्यक्रमासाठी अनुदान

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१६/प्र.क्र.२१३/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१
तारीख: ३० मार्च, २०१७

<u>वाचा -</u>

१) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, क्र.** ग्रापापु-१०८९ /सीआर २६८९/४३, दिनांक १७ जानेवारी, १९९०
२) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.** भूजल १०९८/प्र.क्र.४६५/पापु १५ दि.१६ ऑक्टोबर, १९९८
३) **शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र:** विघयो-२०१५/ प्र.क्र.१८७/विघयो दिनांक ५ मार्च ,२०१६
४) **शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः** अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दिनांक २० एप्रिल २०१६

<u>प्रस्तावना -</u>

उच्च क्षमतेच्या विंधण विहिरीवर पुरेश्या पाण्याच्या उपलब्धतेची निदान ८-१० वर्षे शाश्वती, संबंधित गावात/वस्त्यात अशा प्रकारच्या उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर विद्युतपंप बसविण्याची आवश्यकता, याबाबी विचारात घेऊन विद्युतपंप बसविण्याचा कार्यक्रम राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या कार्यक्रमासाठी गावे/वाडयांची निवड करण्याकरीता संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये, निकष विहित करण्यात आले आहेत. तसेच, विंधन विहिरीवर बसविलेल्या हातपंप व विद्युतपंपाची देखभाल व दुरुस्ती करण्याकरिता आणि पिण्याच्या पाण्यासाठी घेतलेल्या जुन्या विंधण

विहिरींचे पुनरुज्जीवन (जलभंजन) करण्याकरिता अवलंबावयाची कार्यपध्दती व निकष संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये विहित करण्यात आले आहेत.

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात ग्रामीण पाणी पुरवठा या जिल्हास्तरीय योजनांतर्गत कार्यक्रमाखालील विशेष घटक योजनेंतर्गत उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर विद्युत पंप बसविणे तसेच हातपंप/ विद्युतपंप देखभाल व दुरुस्ती आणि विंधण विहिरींचे जलभंजन या कार्यक्रमाकरीता एकूण रु.१०७.५६ लाख इतकी तरतूद करण्यात आली आहे. संदर्भ क्र.३ च्या परिपत्रकान्वये सामाजिक न्याय व आदिवासी विकास विभागाच्या जिल्हा वार्षिक योजनेच्या तरतूदी १००% वितरीत करण्यास सहमती दिलेली आहे. त्याप्रमाणे तरतूद अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेली आहे. सदर अनुदानापैकी विंधण विहीरींचे जलभंजन करण्यासाठीचे अनुदान संबंधित जिल्हा परिषदा व भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर विद्युत पंप बसविणे तसेच हातपंप/ विद्युतपंप देखभाल व दुरुस्ती हा कार्यक्रम राबविण्याकरिता संबंधित जिल्ह्याचे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यांना एकुण रु. ६७.६५ लाख (अक्षरी रुपये सदुसष्ट लाख, पासष्ट हजार फक्त) आणि विंधण विहिरींचे जलभंजन हा कार्यक्रम राबविण्यासाठी संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना रु. ४.५० लाख (अक्षरी रुपये चार लाख, पन्नास हजार फक्त) या प्रमाणे एकूण रु. ७२.१५ लाख (रुपये बाहत्तर लाख, पंधरा हजार फक्त) एवढे अनुदान मंजूर करण्यात येत असून सोबतच्या विवरणपत्रातील स्तंभ- ३, ४ व ५ मध्ये दर्शविलेल्या वाटपानुसार अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

सन-२०१६-१७ या आर्थिक वर्षात विंधण विहिरींचे जलभंजन या कार्यक्रमाकरीता संचालक, भूजल सर्वेक्षण यंत्रणा, पुणे यांना जिल्हा अहमदनगर व जिल्हा सोलापुर या जिल्हयांकरिता अनुक्रमे रु. १.५० लाख व रु.३.०० लाख एवढे अनुदान मंजुर करण्यात येत असुन, अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहे. विंधण विहीरींचे जलभंजन संदर्भ क्र.१ व २ येथे नमुद शासन निर्णयातील विहीत कार्यपद्धती, अटी व शर्तींच्या अधीन राहून राबविण्यात यावेत. सदर अनुदान खर्च करताना पुढील सुचनांचे पालन करावे.

१. हे अनुदान मंजूर करण्यात आलेल्या विनिर्दिष्ट प्रयोजनासाठीच खर्च करावे.

२. या अनुदानातुन केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावे.

३. या कार्यक्रमांतर्गत घेतलेल्या कामांचा भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल शासनास दर महिन्याच्या ५ तारखेपर्यंत न चुकता सादर करावा.

४. वरील मंजूर अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनाकडे विहीत प्रपत्रात सादर करण्यात यावीत.

५. तसेच मासिक विवरणपत्रानुसार ( Cash Flow) अनुदान खर्ची करण्यात यावे.

६. मंजूर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदलेल्या खर्चाबरोबर मेळ घालण्यात यावा व विहीत अहवाल शासनाकडे सादर करावा.

(रक्कम रु. लाखात)

| अ.क्र. | जिल्हा परिषद/जिल्हा | उच्च क्षमतेच्या विंधण विहीरींवर विद्युतपंप बसविणे | हातपंप /विद्युतपंप देखभाल व दुरुस्ती | कमी क्षमतेच्या विंधणविहीरीचे जलभंजन करणे |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | नाशिक | ०.०० | ५.०० | ०.०० |
| २ | अहमदनगर | ०.०० | ०.०० | १.५० |
| ३ | सातारा | ०.०० | ०.०० | ०.०० |
| ४ | सोलापुर | ०.०० | ०.०० | ३.०० |
| ५ | कोल्हापुर | ००.०० | ०.०० | ०.०० |
| ६ | जालना | २७.५० | ११.०० | ०.०० |
| ७ | बीड | २४.१५ | ०.०० | ०.०० |
| **एकुण** | | **५१.६५** | **१६.००** | **४.५०** |

३. याबाबतचा खर्च "मागणी क्र. वाय - २, २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता - ०१, पाणी पुरवठा - १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम - (डी) अनुसूचित जातीकरीता विशेष घटक योजना- पिण्याचे पाणी पुरवठयाचा ग्रामीण कार्यक्रम - (०२) (१२) वीजपंप बसविणे /हातपंपाचे विद्युतपंपाचे रुपांतर करणे (२२१५- १८०७)" या लेखाशीर्षाखाली खर्ची घालावा व त्या शीर्षाखाली २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१११३३४८९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d8086 3da34d0a26661f5eefb602c359549d8e d4511e, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2017.03.30 12:38:56 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त, नाशिक, पुणे, औरंगाबाद , अमरावती
२. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक, अहमदनगर,सातारा, सोलापूर, बीड,जालना,कोल्हापूर
४. उप संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे, नाशिक,औरंगाबाद.
५. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नाशिक, अहमदनगर,सातार, सोलापूर, बीड, जालना,कोल्हापूर
६. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नाशिक, अहमदनगर, सातारा,सोलापूर, बीड,जालना,कोल्हापूर
७. उपअभियंता (यां), ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नाशिक, अहमदनगर, सातारा, सोलापूर, बीड,जालना,कोल्हापूर
८. कोषागार अधिकारी , नाशिक, अहमदनगर,सातारा, सोलापूर, बीड, जालना, कोल्हापूर
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
१०.महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
११.मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१२.उपमुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा, नाशिक, पुणे. औरंगाबाद, अमरावती
१३.सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने पापु-०४, पापु-०५ , पापु १० व पापु-२०
१५.निवड नस्ती पापु-१५.